राज्य सांस्कृतिक पुरस्कार योजनेतंर्गत निवड
समितीची पुनर्रचना करणेबाबत.

महाराष्ट्र शासन
पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग
शासन निर्णय क्र. रासांपु २१२० (१३) /प्र. क्र. १७३ /सां.का.४
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
दिनांक : ४ ऑक्टोबर, २०२१

वाचा :- १) शासन निर्णय, समाज कल्याण, सांस्कृतिक कार्य, क्रिडा व पर्यटन विभाग, क्र. एडब्ल्यूडी-१०९१/प्र.क्र.१२०/सां.का१, दि.३० जुलै, १९९२
२) शासन निर्णय, पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, क्र. पूरक २०११ / प्र. क्र. १५० /सां.का.४, दिनांक १३ एप्रिल, २०१२
३) शासन निर्णय, पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, क्र. रासांपु २११८ (१३)/ प्र.क्र.३०१/सां.का.४, दिनांक २९ नोव्हेंबर, २०१८
४) शासन निर्णय, पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, क्र. संकीर्ण ८२२०/ प्र.क्र.१५/सां.का.४, दिनांक १८ जानेवारी, २०२०

प्रस्तावना :-

उपर्निर्दिष्ट शासन निर्णय क्र.१ अन्वये सांस्कृतिक क्षेत्रात विशेष लक्षणीय कार्य करणाऱ्या कलावंत मान्यवरांना राज्य सांस्कृतिक पुरस्कार प्रदान करण्याविषयीच्या नियमात सुधारणा करण्यात आली आहे. त्यानुसार उपर्निर्दिष्ट शासन निर्णय क्र.२ अन्वये राज्य सांस्कृतिक पुरस्कार निवड समितीची पुनर्रचना करण्यात आली आहे. उपर्निर्दिष्ट क्र. ४ अन्वये सर्व समित्यांवरील अशासकीय कार्याध्यक्ष / सदस्य यांच्या नेमणुका रद्द करण्यात आल्या आहेत. त्यामुळे राज्य सांस्कृतिक समितीची पुनर्रचना करण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

शासन निर्णय :-

या शासन निर्णयान्वये खालीलप्रमाणे राज्य सांस्कृतिक पुरस्कार निवड समितीची पुनर्रचना करण्यास मान्यता देण्यात येत आहे :-

अ) शासकीय सदस्य

| | | |
|---|---|---|
| १. | मा. मंत्री, सांस्कृतिक कार्य | अध्यक्ष |
| २. | प्रधान सचिव / सचिव, सांस्कृतिक कार्य विभाग | सदस्य |
| ३. | संचालक, सांस्कृतिक कार्य संचालनालय | सदस्य सचिव |

ब) अशासकीय सदस्य

| अ.क्र. | नांव |
|---|---|
| १. | श्रीमती झेलम परांजपे |

| | |
|---|---|
| २. | उस्ताद सिराज खान |
| ३. | श्रीमती संगीता टेकाडे |
| ४. | श्री. प्रियदर्शन जाधव |
| ५. | श्री. रामकृष्ण पाटील |
| ६. | श्री. दिगंबर नाईक |
| ७. | श्री. हिरालाल पेंटर |
| ८. | श्री. आझाद नाईकवडी |
| ९. | श्रीमती शकुंतला नगरकर |
| १०. | श्रीमती मंजुषा पाटील |
| ११. | श्री. अभिजीत पोहणकर |
| १२. | श्री. नंदेश उमप |

२. सदर समित्यांचा कालावधी, या शासन निर्णयाच्या दिनांकापासून पुढील तीन वर्षे किंवा समितीची पुनर्रचना होणे यापैकी जे अगोदर घडेल तोपर्यंत असेल.

३. प्रवास व बैठक भत्ता :-

समितीच्या अशासकीय सदस्यांना वित्त विभागाच्या प्रचलित शासन निर्णयानुसार प्रवास भत्ता व बैठक भत्ता अनुज्ञेय राहील.

४. यासाठी संचालक, सांस्कृतिक कार्य संचालनालय यांना नियंत्रक अधिकारी व लेखाधिकारी, सांस्कृतिक कार्य संचालनालय यांना आहरण व संवितरण म्हणून घोषित करण्यात येत आहे.

५. यासाठीचा खर्च हा मागणी क्र. झेडडी-२, मुख्यलेखाशिर्ष २२०५, १०२- कला व संस्कृती यांचे प्रचालन, ०५ कलाक्षेत्रात उल्लेखनीय पारितोषिके, (०५) (०१) अभिनित कलाक्षेत्रात उल्लेखनीय कार्याबद्दल पारितोषिके, ०५ पुरस्कार (२२०५ १४३६) या योजनेतंर्गत उपलब्ध तरतूदीतून भागविता यावा.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेत स्थळावर उपलब्ध करण्यात येत असून त्याचा सांकेतांक क्रमांक २०२११००४१७२०३३२६०२३ असा आहे.

**महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,**

**( विलास रा. थोरात )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

प्रत,

१. मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
२. मा. उपमुख्यमंत्री यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२

३. मा. मंत्री, सांस्कृतिक कार्य यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
४. मा. राज्यमंत्री, सांस्कृतिक कार्य यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
५. सर्व मा. मंत्री / मा. राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
६. मा. विरोधी पक्ष नेता, विधानसभा / विधान परिषद
७. सर्व विधानमंडळ सदस्य, मुंबई
८. सचिव (सांस्कृतिक कार्य), पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई
९. उप सचिव (सांस्कृतिक कार्य), पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई
१०. संचालक, सांस्कृतिक कार्य संचालनालय, मुंबई
११. सर्व शासकीय / अशासकीय सदस्य (संचालक, सांस्कृतिक कार्य संचालनालयामार्फत)
१२. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,
१३. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई,
१४. महालेखापाल (लेखा परीक्षा) -१ महाराष्ट्र, मुंबई
१५. महालेखापाल (लेखा परीक्षा) - २ महाराष्ट्र, नागपूर
१६. महालेखापाल (लेखा अनुज्ञेयता) - १ महाराष्ट्र, मुंबई
१७. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) - २ महाराष्ट्र, नागपूर
१८. अवर सचिव, अर्थसंकल्प शाखा, पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग
१९. निवड नस्ती, सां.का.४